**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, शहापूर, यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, डोळखांब, ता.शहापूर, जि.ठाणे येथील टप्पा-१ मधील इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**शासन निर्णय क्रमांक : शाआबां-२०१०/प्र.क्र.३३६/का.१३**
**आदिवासी विकास विभाग,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :- २० ऑक्टोबर, २०१०.**

**<u>वाचा :</u>**
१) शासन निर्णय क्र.शाआंबा-१३०४/प्र.क्र.१९५/का.१७, दि.७/६/२००५
२) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे जा क्र.शाआबां-२००९/प्र.क्र.११७/का.८ (२) दि.१९/२० मे, २०१० चे पत्र.
३) कार्यकारी अभियंता, ठाणे बांधकाम विभाग, ठाणे यांचे जा.क्र.ठाबांवि/प्रशा-२,४७९१, दि.३१/७/२०१० चे पत्र.
४) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचा शासन निर्णय क्र.मातंसं/नस्ती २०१०/प्र.क्र.३४/३९, दि.६/८/२०१०

**शासन निर्णय :** आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी त्यांचे दिनांक १९/२० मे, २०१० च्या पत्रान्वये प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, शहापूर यांचे कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, डोळखांब, ता.शहापूर, जि.ठाणे येथील टप्पा-१ मधील इमारत बांधकामाचे एकूण रु.४,१४,१७,१११/-इतक्या रक्कमेचे सुधारित अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहे. सदरील कामास रु.१,७३,०१,५८२/- इतक्या रक्कमेस शासन निर्णय दि.७/६/२००५ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केलीली आहे. तथापि सर्व साधारणपणे वाढीव दर व जोत्याचे क्षेत्रफळ वाढल्याने रु.४,१४,१७,१११/- इतक्या रक्कमेच्या सुधारित अंदाजपत्रकातून ८% विद्युतीकरणाचा खर्च वगळून एकूण रु.३,८७,०१,२३५/- इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्याच्या अनुषंगाने तांत्रिक बाबी तपासण्यासाठी सदर सुधारीत अंदाजपत्रक व आराखडा सार्वजनिक बांधकाम विभागाकडे सादर करण्यात आले होते.

२. सुधारित अंदाजपत्रक कनिष्ठ अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, शहापूर यांनी तयार केलेले असून उपविभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, शहापूर यांनी तपासले आहे. तसेच उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, शहापूर, कार्यकारी अभियंता, ठाणे बांधकाम विभाग, ठाणे व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे यांनी साक्षांकीत केले आहे.

३.	सदर अंदाजपत्रकातील वाढ क्षेत्रफळात झालेली वाढ तसेच दरसूचीमधील झालेली वाढ यामुळे झाल्याच्या स्पष्टीकरणासह प्रस्तुत कामाच्या सुधारित अंदाजपत्राकाच्या रु.३,८७,०१,२३५/- इतक्या रकमेच्या कामास (विद्युतीकरण वगळता) सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यास सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दिलेली आहे.

४.	सदर सुधारीत अंदाजपत्रक सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारीत आहे. तरी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, शहापूर, जि.ठाणे यांचे कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, डोळखांब, ता.शहापूर, जि.ठाणे येथील टप्पा-१ मधील इमारत बांधकामाच्या रु.३,८७,०१,२३५/- (रुपये तीन कोटी सत्याऐंशी लाख एक हजार दोनशे पस्तीस फक्त) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास (विद्युतीकरण वगळता) सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

५.	सदर शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५/५/२००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-५ मधील अ.क्र.१ व सार्वजनिक बांधकाम विभाग, नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१०१०२०१९०८४७००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( कैलास द.भंडलकर )
उप सचिव

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे .
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, शहापूर.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे
श्री.सी.डी.वाघ,कार्यकारी.अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मालेगांव (समन्वय अधिकारी)
कार्यकारी अभियंता, ठाणे बांधकाम विभाग, ठाणे.
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, शहापूर, जि.ठाणे.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

F:\BACKUP\D\2010\Construction\P.W.DC.R.336.lwp